**सुधारित प्रशासकीय मान्यता-**

**मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद येथील न्यायालयीन संकुलनासाठी पाण्याची टाकी बांधण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र.सीसीबी-१११४/२५०/प्र.क्र.५७/का-१३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक:-१५ फेब्रुवारी, २०१९.

**पहा :-** १) प्रबंधक (निरिक्षणे-२), उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र. बी (डब्ल्यू) १६२६/१९८१, दि. २१ मे, २०१५ चे पत्र.
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय क्र.सीसीबी-१३०५/१३९६/प्र.क्र.१०३/का-१३, दि.२८ नोव्हेंबर, २००५

**प्रस्तावना:-**

उपरोक्त संदर्भाधिन क्र.१ च्या पत्रान्वये, मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद येथील न्यायालयीन संकुलनासाठी पाण्याची टाकी बांधण्याबाबतचा प्रस्ताव मा. उच्च न्यायालय, मुंबई यांच्याकडून शासनास सादर करण्यात आला आहे.यापूर्वी संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये रू.१,०५,६२,६२५/- इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे, त्या अनुषंगाने सदरहू प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ, औरंगाबाद येथील न्यायालयीन संकुलनासाठी पाण्याची टाकी बांधण्याबाबत रु.१,६३,०३,१००/- (रुपये एक कोटी त्रेसष्ठ लक्ष तीन हजार शंभर फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | तपशिल | रक्कम (रूपये) |
|---|---|---|
| 1. | Working Survey | 25,000/- |
| २. | Sump and Pump house | 19,46,208/- |
| 3. | Rising Main 150 mm dia. DI K 9 L = 750 m | 18,47,003/- |
| 4. | Pumping Machinery 15 BHP Monoblock 2 Nos. | 7,57,071/- |
| 5. | RCC ESR Cap. 250000 Lit. Staging Ht. 18 M | 33,71,114/- |
| 6. | Distribution System | 52,80,011/- |
| 7. | Miscellaneous work, Trial Run etc. | 6,48,550/- |
| | Net Cost Rs. | 1,38,74,957/- |
| | Add 17.5% ETP Charges | 24,28,117/- |
| | **एकूण प्रकल्प खर्च रुपये :-** | **1,63,03,074/-** |
| | **म्हणजेच एकूण रुपये:-** | **1,63,03,100/-** |

२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

अ) काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.

ब) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

क) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३ / प्र.क्र.१७७/ तां.क.१, दि. १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ड) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

इ) सावर्जनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/ इमारती-२, दि. ०७.०७.२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ई) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

उ) सदर कामास सुधारीत प्रशासकीय मान्यता दिलेल्या किंमतीत पूर्ण करण्यात यावे

३. या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-८, ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च-०१, कार्यालयीन इमारती-०५१,बांधकाम-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०३) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना-राज्य हिस्सा), योजनांतर्गत, (०३) (०१) मोठी बांधकामे, ५३-मोठी बांधकामे (४०५९०६७२) व (२१) न्यायदान (केंद्रपुरस्कृत योजना- केंद्र हिस्सा), (२१) (०१) मोठी बांधकामे, ५३ मोठी बांधकामे (४०५९१२२२)" लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक:-२३९/इमा-२, दि.२१.०८.२०१५ रोजी दिलेल्या सहमतीने, पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१/२०१६, दिनांक १९.०१.२०१६ रोजी दिलेल्या सहमतीने, नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६०/१४४३, दिनांक ०३.०६.२०१६ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.५८६/२०१७/व्यय-५, दिनांक २५.०६.२०१७ अनुसार त्या विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभाग शासन निर्णय क्र:-विअप्र २०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम,भाग-२ दि.१७ एप्रिल,२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संकेतांक २०१९०२१५१३१११०८८१२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Kawadu M Nimje
Date: 2019.02.15 13:14:09 +05'30'

**( क. म. निमजे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. सभापती, विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२) मा.अध्यक्ष, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, विधान परिषद/ विधानसभा ,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४) महाप्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई,
५) मा.प्रबंधक, (प्रशासन) मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद, औरंगाबाद.
६) उप प्रबंधक बी (डब्ल्यू ) शाखा, उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन, नागपूर,
८) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, शहरी व ग्रामीण योजना, औरंगाबाद
९) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, शहरी व ग्रामीण उपविभाग, औरंगाबाद. (मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
१०) उप विभागीय अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, शहरी व ग्रामीण उपविभाग, औरंगाबाद
११) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
१२) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१३) वित्त विभाग/व्यय-५, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४) नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१५) अपर आयुक्त व सदस्य सचिव, मराठवाडा वैधानिक विकास मंडळ, नवीन प्रशासकीय इमारत, जिल्हाधिकारी कार्यालय परिसर, औरंगाबाद.
१६) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१७) कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२,विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१८) निवड नस्ती/संग्रहार्थ.